**पोलीस उपनिरीक्षकांची ७३५ अधिसंख्य पदे महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**गृह विभाग, मंत्रालय,**
**शासन निर्णय क्रमांक-पोलीस-१८१६/प्र.क्र.३४२/पोल-५अ,**
मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ११ फेब्रुवारी २०२०

**संदर्भ** पोलीस महासंचालक, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/५/१०/ससे-पोउपनि (मुख्य) परीक्षा/२०१६/१५०/२०१७

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने पोलीस उपनिरीक्षक (पुरुष व महिला बिनहत्यारी) (मुख्य) परीक्षा - २०१७ मधून शिफारस पात्र ६५० उमेदवार , मागील सत्रात मुदतवाढ घेतलेले २४ उमेदवार, पोलीस उपनिरीक्षक सरळसेवा मुख्य परीक्षा - २०१६ मधील महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या सुधारित निकालानूसार शिफारस पात्र ठरलेले ४४ उमेदवार, पोलीस उपनिरीक्षक मर्यादित विभागीय मुख्य परीक्षा - २०१६ मधील आयोगाने सुधारित यादीनूसार शिफारसपात्र ठरलेले १० उमेदवार, सत्र क्र.११५ व सत्र क्र.११६ मधील विविध कारणास्तव प्रशिक्षणास न पाठविलेले ०६ उमेदवार व अनुकंपा वरून आलेले ०१ उमेदवार अशाप्रकारे एकुण (६५०+२४+४४+१०+०६+१) ७३५ उमेदवारांचे पोलीस उपनिरीक्षक पदाचे प्रशिक्षण दि.०७/०१/२०२० ते दि.०६/०१/२०२१ या कालावधीकरीता महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक येथे सुरु झाले आहे. सदर उमेदवारांचे वेतन व भत्ते अदा करण्याकरीता महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक यांच्या आस्थापनेवर ७३५ पोलीस उपनिरीक्षकांची अधिसंख्य पदे निर्माण करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय :-**

पोलीस उपनिरीक्षक (पुरुष व महिला बिनहत्यारी) (मुख्य) परीक्षा - २०१७ मधून शिफारस पात्र ६५० उमेदवार, मागील सत्रात मुदतवाढ घेतलेले २४ उमेदवार, पोलीस उपनिरीक्षक सरळसेवा मुख्य परीक्षा - २०१६ मधील महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या सुधारित निकालानूसार शिफारस पात्र ठरलेले ४४ उमेदवार, पोलीस उपनिरीक्षक मर्यादित विभागीय मुख्य परीक्षा - २०६ मधील आयोगाने सुधारित यादीनूसार शिफारसपात्र ठरलेले १० उमेदवार, सत्र क्र.११५ व सत्र क्र.११६ मधील विविध कारणास्तव प्रशिक्षणास न पाठविलेले ०६ उमेदवार व अनुकंपा वरून आलेले ०१ उमेदवार अशाप्रकारे एकुण (६५०+२४+४४+१०+०६+१) ७३५ पोलीस उपनिरीक्षक प्रशिक्षणार्थी पोलीस उपनिरीक्षकांचे वेतन व भत्ते अदा संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक येथे अदा होण्याकरीता, विविध पोलीस घटकांमध्ये रिक्त असलेल्या पोलीस उपनिरीक्षकांच्या पदाच्या अधीतने, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक येथे दि.०७/०१/२०२० ते दि.०६/०१/२०२१ या प्रशिक्षण

कालाधीसाठी पोलीस उपनिरीक्षकांची ७३५ अधिसंख्य पदे निर्माण करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. पोलीस उपनिरीक्षक रिक्त पदे ज्या आस्थापनेवर आहेत त्या आस्थापनेवर वेतन काढले जाणार नाही याची खात्री करण्यात यावी.

२. या प्रकरणी होणारा खर्च हा वित्तीय वर्ष २०१९-२०२० व २०२०-२०२१ करिता "मागणी क्रमांक-बी-१, २०५५-पोलीस, १०९ (००)(०१) जिल्हा पोलीस बल" या लेखाशीर्षाखाली संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक यांना मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हे आदेश शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-६, दि.२०/०२/२०१६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२१११७१०४१८२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nandkishor E Phondke

Digitally signed by Nandkishor E Phondke
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6a5903048d642cefc6337213e3f30717e6dad54e4fb3f1104faf558a801e22c6, serialNumber=467ebbe4032d291a9645606adabcd97b8738325342cac3bd7a0225daf7637339, cn=Nandkishor E Phondke
Date: 2020.02.11 17:12:33 +05'30'

**( नं.ए.फोंडके )**
**अवर सचिव, गृह विभाग**

**प्रत** -

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६) अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक.
८) पोलीस उपमहानिरीक्षक, विशेष सुरक्षा विभाग, मुंबई.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
१०) कक्ष अधिकारी (व्यय-७ / विसु-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) संग्रहार्थ / पोल-५अ